ग्रामपंचायत कर्मचा-यांच्या भविष्य निर्वाह निधीबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः व्हीपीएम-२०१६ /प्र.क्र.१७६/पंरा-३**
बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई ४०० ००१
तारीख: २ ऑगस्ट,२०१७.

वाचा

शासन परिपत्रक क्र.ग्रापनि१००४/प्र.क्र.२७६/पंरा-५ दिनांक ३१/१०/२००५

**प्रस्तावना -**

शासन परिपत्रक ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्र.व्हिपीएम २६००/प्र.क्र.६८५/२१ दि.२१ नोव्हेबर,२००० अन्वये ग्रामपंचायत कर्मचाऱ्यांसाठी महाराष्ट्र ग्रामपंचायत (कर्मचारी) भविष्य निर्वाह निधी नियम १९६१ लागू करण्यात आले आहे. संदर्भाधिन शासन परिपत्रकान्वये सर्व ग्रामपंचायतींनी त्यांच्या कर्मचा-यांना प्रत्यक्ष अदा करण्यात येत असलेल्या वेतनाच्या ८.३३% या दराने कर्मचा-यांची भविष्य निर्वाह निधी वर्गणी व तेवढीच रक्कम ग्रामपंचायतीचा हिस्सा म्हणून यासाठी उघडण्यात आलेल्या संयुक्त बँक खात्यात जमा करण्याबाबत निर्देश देण्यात आलेले आहेत. सदर परिपत्रकातील तरतुदीनुसार काही ग्रामपंचायती कर्मचाऱ्यांच्या वेतनातून भविष्य निर्वाह निधीची रक्कम नियमितपणे कपात करतात. परंतु, काही ग्रामपंचायती सदर कपात केलेली रक्कम व ग्रामपंचायतीचा हिस्सा संयुक्त बँक खात्यात किंवा पोष्टात जमा करत नाहीत अशा तक्रारी शासनाकडे प्राप्त होत आहेत. ही बाब अतिशय गंभीर आहे. अशा ग्रामपंचायतींवर कडक कारवाई करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक-**

२ या शासन परिपत्रकान्वये असे निर्देश देण्यात येत आहेत की, ज्या ग्रामपंचायती त्यांच्या कर्मचा-यांना प्रत्यक्ष अदा करण्यात येत असलेल्या वेतनाच्या ८.३३% या दराने कर्मचा-यांची भविष्य निर्वाह निधी वर्गणी व तेवढीच रक्कम ग्रामपंचायतीचा हिस्सा म्हणून यासाठी उघडण्यात आलेल्या संयुक्त बँक खात्यात किंवा पोस्टात जमा करणार नाहीत अशा ग्रामपंचायतींवर नियमानुसार कडक कारवाई करण्यात यावी व सदर कारवाईमध्ये कोणत्याही प्रकारची हयगय होणार नाही यासाठी सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी वैयक्तिक लक्ष देऊन सर्व संबंधितांना योग्य त्या सूचना द्याव्यात.

३. शासनाने वरील मुदयाच्या अनुषंगाने वेळोवेळी आदेश/सूचना निर्गमित केल्या आहेत. तथापि, त्यांचे पालन अनेक ग्रामपंचायती करीत नाहीत. ही बाब कदापिही योग्य नसल्याने सर्व जिल्हा परिषदेच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांना अशा सुचना देण्यात येत आहेत की, त्यांनी ग्रामपंचायतीच्या कामावर देखरेख ठेवावी आणि शासनाने ग्रामपंचायतींना लागू केलेल्या नियमातील तरतुदी तसेच शासनाने दिलेल्या आदेश/सूचनांचे पालन काटेकोरपणे होईल याची दक्षता घ्यावी. या स्थानिक स्वराज्य संस्थांची कामे पारदर्शीपणे पार पाडली जातील व त्यात काही अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच त्यांच्या कामकाजांचा नियमित आढावा घ्यावा. ग्रामपंचायत कर्मचारी अथवा कर्मचारी संघटनांकडून याबाबत तक्रारी आल्यास त्यांच्या सविस्तर चौकशीअंती जबाबदार अधिकारी व कर्मचारी यांना व्यक्तीश: तसेच सामुहिकरित्या जबाबदार धरुन त्यांच्यावर शिस्तभंगाची कारवाई करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१७०८०२१७३३०२५०२०** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Neela S Ranade

Digitally signed by Neela S Ranade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development And Water Conservation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3fa000534746db92f0157755df1a70d0797969b5baca3c22211cde2ca05529e3, cn=Neela S Ranade
Date: 2017.08.28 11:27:17 +05'30'

**(नीला रानडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा.मंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव
२) मा.राज्यमंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव
३) सचिव (ग्रामविकास ) यांचे स्वीय सहायक
४) उपसचिव (पंरा) ग्रामविकास व जलसंधारण विभाग,मुंबई.
५) सर्व विभागीय आयुक्त
६) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
७) सर्व जिल्हा परिषदांचे उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत),
८) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
९) निवडनस्ती (कार्यासन क्रमांक पंरा-३)